पदोन्नतीच्या संधी नसलेल्या म्हणजेच एकाकी पदांना सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेअंतर्गत अनुज्ञेय असलेल्या समुचित ग्रेड वेतनामध्ये सुधारणा करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## वित्त विभाग

**शासन निर्णय क्रमांकः** आप्रयो १०१४/प्र.क्र.२१/सेवा-३
मंत्रालय, मुंबई-३२
दिनांक:- ६ सप्टेंबर २०१४

**वाचा**

१) शासन निर्णय क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग,क्र.-एसआरव्ही १०९५/प्र.क्र.१/९५/बारा, दि.०८/०६/१९९५
२) शासन निर्णय क्रमांकः वित्त विभाग,क्र.वेतन११९९/प्र.क्र.२/९९/सेवा ३,दि.२०/७/२००१
३) शासन निर्णय क्रमांकः वित्त विभाग,क्र.-वेतन ११०९/प्र.क्र.४३/सेवा ३, दि. ३१/०८/२००९
४) शासन निर्णय क्रमांकः वित्त विभाग,क्र.-वेतन ११०९/प्र.क्र.४४/सेवा ३, दि. ०१/०४/२०१०
५) शासन निर्णय क्रमांकः वित्त विभाग ,क्र.-वेतन ११०९/प्र.क्र.४१/सेवा ३,दि. ०५/०७/२०१०

**प्रस्तावना –**

राज्य शासन व जिल्हा परिषदेकडील पदोन्नतीची संधी नसलेल्या म्हणजेच एकाकी संवर्गातील पदांना उपरोक्त अ.क्र. ५ येथील दि. ०५/०७/२०१० च्या शासन निर्णयान्वये सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेच्या पहिल्या व दुस-या लाभांतर्गत पुढीलप्रमाणे अतिरीक्त (समुचित) ग्रेड वेतन अनुज्ञेय करण्यात आलेले आहे:-

अ) पहिल्या लाभाअंतर्गत अनुज्ञेय करण्यात आलेले अतिरीक्त (समुचित) ग्रेड वेतन.

| मूळ पदाचे ग्रेड वेतन (रूपये) | मूळ पदाच्या /विद्यमान ग्रेड वेतनाव्यतिरिक्त अनुज्ञेय ग्रेड वेतन (रूपये) |
|---|---|
| २०००/-पर्यंत | २००/- |
| २००१/- ते ४०००/- | ३००/- |
| ४००१/-ते ५००० | ४००/- |
| ५००१/- पेक्षा जास्त मात्र ५४०० पर्यंत | ५००/- |

ब) दुस-या लाभाअंतर्गत मंजुर करण्यात आलेले अतिरीक्त (समुचित) ग्रेड वेतन.

| पहिल्या लाभानंतरचे ग्रेड वेतन (रुपये) | दुस-या लाभांतर्गत अनुज्ञेय अतिरिक्त ग्रेड वेतन (रुपये) |
|---|---|
| २०००/-पर्यंत | ३००/- |
| २००१/- ते ४०००/- | ४५०/- |
| ४००१/- ते ५०००/- | ६००/- |
| ५००१/- पेक्षा जास्त मात्र ५९०० पर्यंत | ७००/- |

ज्या पंदाना पदोन्नतीची साखळी उपलब्ध आहे त्या पदावरील पदधारकास रिक्त पदाअभावी १२/२४ वर्षाच्या नियमित सेवेनंतर पदोन्नती न मिळाल्यास त्याला सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजने अंतर्गत पदोन्नतीच्या पदांच्या वेतनश्रेणीमध्ये वेतननिश्चितीचा लाभ मिळतो. त्याउलट एकाकी पदांवर कार्यरत कर्मचा- यांना त्याच वेतनश्रेणीशी संलग्न वेतनामध्ये अतिरीक्त (समुचित) ग्रेड वेतन मिळून वेतननिश्चितीचा लाभ अनुज्ञेय ठरतो. अशा प्रकारे पदोन्नतीची साखळी व पदोन्नतीच्या पदाची वेतनश्रेणी ज्या पदांना उपलब्ध आहे त्या पदावरील पदधारकांना एकाकी पदांवरील कर्मचाऱ्यांपेक्षा अधिक वेतन निश्चितीचा लाभ मिळत असल्याचे दिसून येते. त्यामुळे एकाकी व पदोन्नतीची संधी उपलब्ध नसलेल्या कर्मचा-यांना सध्या सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजने अंतर्गत मिळत असलेला लाभ काही प्रमाणात वाढवून देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीनहोता.

## शासन निर्णय

१. सुधारित आश्वासित प्रगती योजनेअंतर्गत उपरोक्त संदर्भ क्र. ५ वरील शासन निर्णयातील परि. क्र.२ (ब) (२) आणि २ (क) (३) मधील तक्त्यान्वये मंजुर केलेल्या अनुक्रमे पहिल्या व दुस-या लाभांच्या दरामध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे:-

(अ) योजनेचा पहिला लाभ खालील तक्त्यात नमुद केल्याप्रमाणे मंजूर करण्यात येईल:-

| मूळ पदाचे ग्रेड वेतन (रूपये) | मूळ पदाच्या / विद्यमान ग्रेड वेतनाव्यतिरिक्त अनुज्ञेय ग्रेड वेतन (रूपये). |
|---|---|
| २०००/- पर्यन्त | ३००/- |
| २००१ ते ४००० | ४००/- |
| ४००१ ते ५००० | ५००/- |
| ५००१ पेक्षा जास्त मात्र ५४०० पर्यंत | ६००/- |

ब) योजनेचा दुसरा लाभ पहिल्या लाभानंतर १२ वर्षाची नियमित सेवा पूर्ण केलेल्या कर्मचा-यास खालील तक्त्यात नमुद केल्याप्रमाणे मंजुर करण्यात येईल.

| पहिल्या लाभानंतरचे ग्रेड वेतन (रूपये) | दुसऱ्या लाभांतर्गत अनुज्ञेय अतिरिक्त ग्रेड वेतन (रूपये). |
|---|---|
| २०००/- पर्यन्त | ४००/- |
| २००१ ते ४००० | ५५०/- |
| ४००१ ते ५००० | ७००/- |
| ५००१ पेक्षा जास्त मात्र ५९०० पर्यंत | ८००/- |

२. शासन निर्णय,वित्त विभाग,दि.३१/८/२००९ मधील परिच्छेद २(२) मधील तरतूद उपरोक्त लाभ परिगणीत करताना पूर्वीप्रमाणेच लागू राहील.तसेच,शासन निर्णय,वित्त विभाग,दि.५/७/२०१० मधील इतर अटी व शर्ती हे आदेश कार्यान्वीत करताना जशाच्या तशा लागू राहतील.सुधारित दराचे हे आदेश या शासन निर्णयाच्या दिनांकापासून अंमलात येतील.

३. हे आदेश केवळ राज्य शासकीय व जिल्हा परिषदांतर्गत पदोन्नतीची संधी नसलेल्या म्हणजेच एकाकी पदावरील कर्मचाऱ्यांना लागू राहतील.मात्र रोजंदारीवरील,कंत्राटी तत्वावरील व तदर्थ नियुक्त करण्यात आलेल्या कर्मचाऱ्यांना या योजनेचा लाभ अनुज्ञेय असणार नाही.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०६२००१०४९००५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Varsha Sunil Dongre

Digitally signed by Varsha Sunil Dongre
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Varsha Sunil Dongre
Date: 2014.09.06 19:56:27 +05'30'

**श्रीमती वर्षा डोंगरे**
उप सचिव,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपालांचे सचिव,
२. मा. मुख्य मंत्र्यांचे सचिव,
३. मा. उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,
४. मा. राज्यपालांचे सचिव,

५. मा. मुख्य मंत्र्यांचे सचिव,
६. मा. उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,
७. सर्व विधानमंडळ सदस्य,
८. सर्व मंत्री व राज्य मंत्री यांचे खाजगी सचिव,
९. मंत्रालयीन सर्व विभाग,
१०. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय
११. *प्रबंधक,, उच्च न्यायालय (मूळ न्याय शाखा) मुंबई,
१२. *प्रबंधक, उच्च न्यायालय, (अपील शाखा),मुंबई,
१३. *सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१४. *सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
१५. *प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
१६. *प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण मुंबई/नागपूर/औरंगाबाद
१७. मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र, मुंबई.
१८. आयुक्त, राज्य माहिती आयोग (सर्व)
१९. सचिव, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन, १ला मजला, मंत्रालयासमोर, मुंबई ४०० ०३२
२०. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
२१. सर्व विभागीय आयुक्त,
२२. सर्व जिल्हाधिकारी,
२३. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२४. महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे,
२५. महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई,
२६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई,
२७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, मुंबई,
२८. महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, मुंबई,
२९. सिनियर रिसर्च ऑफिसर, पे-रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय, (व्यय विभाग), खोली क्र.२६१, नॉर्थ ब्लॉक, नवी दिल्ली,
३०. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
३१. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई,
३२. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई,

३३. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, वाशी,
नवी मुंबई]

३४. [जिल्हा लेखा परीक्षा अधिकारी, स्थानिक निधी हिशेब, कोकण कृषी विद्यापीठ, दापोली,
जि. रत्नागिरी

३५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई

३६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,

३७. लेखाधिकारी, वेतन पडताळणी पथक, मुंबई / नागपूर / पुणे/ औरंगाबाद

३८. संचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई,

३९. *विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,

४०. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, सहावा मजला, विधान भवन,
मुंबई - ४०० ०३२.

४१. कुल सचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा अहमदनगर,

४२. कुल सचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ , परभणी,

४३. कुल सचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला ,

४४. कुल सचिव, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी,

४५. कुल सचिव, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर,

४६. कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रज्ञान विद्यापीठ, लोणेरे, जिल्हा रायगड,

४७. कुलसचिव, सोलापूर विद्यापीठ, सोलापूर,

४८. कुलसचिव, मुंबई विद्यापीठ, मुंबई,

४९. कुलसचिव, पुणे विद्यापीठ,पुणे,

५०. कुलसचिव, नागपूर विद्यापीठ, नागपूर,

५१. कुलसचिव, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर,

५२. सर्व नगरपालिकांचे मुख्य अधिकारी,

५३. कार्यकारी अधिकारी, कंन्डोनमेंट बोर्ड, खडकी / देहू रोड / देवळाली / अहमदनगर

५४. बहुजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई १

५५. भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.बॅरॅक नं. १, योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक,नरिमन पॉईंट , मुंबई २०

५६. भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभुवन, एस.व्ही.पटेल रोड,मुंबई ४

५७. भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब
मिल पॅलेस, वरळी, मुंबई १३

५८. इंडियन नॅशनल काँग्रेस,महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई २५

५९. नॅशनलिस्ट काँग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईंट, मुंबई २१

६०. शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई २८

६१. शासकीय वाहन चालक संघटना (शासन मान्य), मंत्रालय, मुंबई

६२. वित्त विभागातील सर्व कार्यासने,

६३. निवड नस्ती, कार्यासन सेवा-३.

*पत्राद्वारे.